**मजूर सहकारी संस्थांच्या अडीअडचणी/**
**मागण्यांबाबत स्थापन केलेल्या समितीच्या**
**शिफारशींची अंमलबजावणी करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बैठक ३६२२/प्र.क्र.६९/९-स,**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १४ जुलै, २०२३.

वाचा :-

१. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.न्यायप्र-१५१६/ प्र.क्र.२४५/९-स दिनांक २१/०१/२०१७.
२. शासन आदेश,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. बैठक /३६२२/ प्र.क्र.६९/९-स,, दि.१४.१०.२०२२.
३. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,यांचे पत्र जा.क्र.औद्यो/१६-सआ/मजूर सहकारी संस्था/सभा/अहवाल/सन २२./११४८,दि. ३०/११/२०२२.
४. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,यांचे पत्र क्र.१६-सआ/मजूर/ अडीअडचणी/गठीत समिती अहवाल/२२./१२०३,दि. २६/१२/२०२२.

प्रस्तावना :-

मजुर सहकारी संस्थांच्या विविध अडचणी / मागण्यांबाबत तसेच मजुर सहकारी संस्थांच्या कामकाजात सुसुत्रता आणणे व संस्थांना भेडसावणाऱ्या समस्या सोडविण्याच्या उद्देशाने धोरणात्मक निर्णय घेण्याकरीता, महाराष्ट्र राज्य मजूर सहकारी संघ व इतर जिल्हा मजूर सहकारी संघ यांनी दिलेल्या निवेदनावर मा.मंत्री (सहकार) यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १५/०९/२०२२ रोजी शासन स्तरावर बैठक घेण्यात आली होती. या बैठकीतील निर्देशाच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक १४/१०/२०२२ च्या शासन आदेशान्वये समिती गठनाचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. अप्पर निबंधक (तपासणी व निवडणूका) यांचे अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीने संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक ३०/११/२०२२ अन्वये आपला अहवाल शासनास सादर केला होता. या अहवालावर संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी आपले अभिप्राय शासनास कळविले होते. स्थापन केलेल्या समितीचा अहवाल, त्यावरील सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे अभिप्राय, मजुर सहकारी संस्थांच्या मागण्या / अडीअडचणी या सर्वांचा साकल्याने विचार करुन निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मजूर सहकारी संस्थांच्या अडीअडचणी / मागण्या याबाबत स्थापन केलेल्या समितीच्या अहवाला आधारे खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

| अ.क्र | मजूर सहकारी संस्थांच्या अडीअडचणी / मागण्या | निर्णय |
|---|---|---|
| १ | मजूर सहकारी संस्थेतील सभासदांचे राजीनामा व नवीन सभासद करणेबाबतचे अधिकार. | महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या कलम २२ व २३ नुसार सभासदत्व देण्याचे अधिकार संस्थेस आहेत. सहकार कायदयानुसार खुले सभासदत्व असल्याने संस्थेचे सभासदत्व देणे व सभासद राजीनामा मंजूर करणे हे अधिकार इतर संस्थेप्रमाणे मजूर सहकारी संस्थांना देणे आवश्यक आहे. त्यामुळे मजूर संस्थेतील सभासदांचे राजीनामे त्याचप्रमाणे नवीन सभासद करुन घेण्याचे अधिकार संस्थेस देण्यात यावे. तथापि, अपात्र व्यक्तींना सभासदत्व दिल्यास सहकार कायदयातील तरतुदीनुसार संचालक मंडळ कारवाईस पात्र राहील. |
| २ | मजूर सहकारी संस्थेत सभासदत्व देताना मजूर असल्याचा पुरावा व इतर कागदपत्रांबाबत. | ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्र.आर.टी.एस - २०१८/प्र.क्र/१४५/आस्था-५ दिनांक १३/०२/२०१९ नुसार मजूर असल्याबाबत मजूराचे स्वयंघोषणापत्र, मजूर सहकारी संस्थेत हंगामी मजूर म्हणून ९० दिवस मजूरीचे काम केल्याचा पुरावा किंवा शासकीय / निमशासकीय /सहकारी संस्थेकडे काम केल्याचा हजेरीपट पुरावा, कार्यविवरण (जॉब कार्ड) इत्यादी कागदपत्रे ग्राहय धरण्यात यावीत. तथापि, अपात्र व्यक्तींना सभासदत्व दिल्यास संचालक मंडळ कारवाईस पात्र राहील. सदर कारवाई करण्याचे अधिकार महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम /नियम/ परिपत्रकानुसार संबंधीत निबंधकास राहतील. |
| ३ | मजूर सहकारी संस्थेमध्ये सुशिक्षित / तांत्रिक अशा २ व्यक्तीस सभासदत्व देणेबाबत. | याबाबत महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम २४ व २७ (८) मध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही शासन स्तरावर विहित कायदेशीर प्रक्रियेचा अवलंब करुन करण्यात यावी. |

| | | |
|---|---|---|
| ४ | संस्थेने घेतलेल्या कामांची नोंद जिल्हा संघाच्या दप्तरी होण्याच्या दृष्टीने व संघाची वर्गणी जमा होणे सोईस्कर व्हावे यासाठी ई-निविदा भरताना मजूर सहकारी संस्थांना ई-निविदेवर प्रत्येक काम घेताना जिल्हा मजूर सहकारी संघाचा ना-हरकत दाखला घेणे आवश्यक आहे. | मजूर संस्थांना जिल्हा उपनिबंधक यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय काम वाटप समिती मार्फत कामे दिली जातात. तथापी, ई-निविदा प्रक्रीयेमध्ये जिल्हा काम वाटप समितीचा संबंध येत नाही त्यामुळे ई-निविदेवरील प्रत्येक कामासाठी जिल्हा संघाचा ना-हरकत दाखला अनिवार्य राहील. |
| ५ | मजूर सहकारी संस्थांची निवडणूक संस्था स्तरावर घेणेबाबत. | महाराष्ट्र सहकारी संस्था (समितीच्या निवडणूका) नियम २०१४ चे नियम ४ उपनियम (V) Type “E” संस्था वर्गामध्ये मजुर सहकारी संस्थांचा समावेश करणेबाबत शासन स्तरावरून कार्यवाही करण्यात यावी. |
| ६ | मजूर सहकारी संस्थांना विना निविदा कामे घेण्याच्या मर्यादेत रु.१०.०० लाखावरुन रु.३०.०० लाखापर्यंत व ई-निविदामध्ये कामे घेण्याची मर्यादेत रु.३०.०० लाखावरुन रु.०१.०० कोटीपर्यंत वाढ करणे व प्रतिवर्षी विना-निविदा कामे रु.१.०० कोटी पर्यंत व ई-निविदा मार्फत घ्यावयाची कामे रु.२.०० कोटी पर्यंत अशी एकूण रु.३.०० कोटी पर्यंत कामाच्या मर्यादेत वाढ करण्यात यावी. तसेच विद्युत व यांत्रीक कामे मजुर संस्थांना विना निविदा घेण्याची मर्यादा रु.३.०० लाखावरुन रु.५.०० लाख करणेबाबत. सार्वजनिक बांधकाम विभाग व इतर संबंधीत विभागास शिफारस करणेबाबत. | मजूर सहकारी संस्थांना विना निविदा कामे घेण्याच्या मर्यादेत रु.१०.०० लाखावरुन रु.३०.०० लाखापर्यंत व ई-निविदामध्ये कामे घेण्याच्या मर्यादेत रु.३०.०० लाखावरुन रु.६०.०० लाखापर्यंत वाढ करणे व प्रतिवर्षी विना-निविदा कामे रु.१.०० कोटी पर्यंत व ई-निविदा मार्फत घ्यावयाची कामे रु.२.०० कोटी पर्यंत अशी एकूण रु.३.०० कोटी पर्यंत कामाच्या मर्यादेत वाढ करणेबाबत तसेच विद्युत व यांत्रीक कामे मजुर संस्थांना विना निविदा घेण्याची मर्यादा रु.३.०० लाखावरुन रु.५.०० लाख करणेबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग व इतर संबंधीत विभागास प्रस्ताव पाठविण्यात यावा. |
| ७ | १. संस्था नोंदणी करताना ज्या विभागात नोंदणी करावयाचे असते त्याच विभागातील एखादया सभासदाचा घरचा पत्ता हा नोंदणीकृत करण्यासाठी भाडयाने / बिन भाडेतत्वावर अथवा नाममात्र भाडयाने घेतला जातो. त्या ठिकाणी कायम स्वरुपी कर्मचारी नियुक्त | सदर बाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म.रा, पुणे यांच्याकडील परिपत्रक दिनांक ०६/१२/२००८ मध्ये बदल करण्याची कार्यवाही करावी. |

| | | |
|---|---|---|
| | करणे शक्य नसते म्हणून संस्थेच्या पदाधिकाऱ्यांपैकी कोणत्याही एका पदाधिकाऱ्यांच्या घरी संस्थेचे रेकॉर्ड / दप्तर ठेवून तेथून संस्थेचा कारभार चालविला जातो. म्हणून संस्थेचा पत्रव्यवहाराचा व संस्थेचा कार्यालयीन पत्ता समजण्यात यावा अशा ठिकाणी संस्थेची तपासणी अथवा पत्रव्यवहार करणे नोंदणी अधिकाऱ्यास सोयीस्कर होईल. | |
| | २. शासकीय मान्यता प्राप्त मजूरीच्या दराने कुशल व स्थानिक हंगामी मजूर उपलब्ध होत नसल्याने कामे करण्यास विलंब होतो. सबब मार्केट रेट प्रमाणे संबंधितांना मजूरी देण्याचे अधिकार संस्थेस असावेत. | मजूरी दर हे रोजगार हमी योजनेच्या मजूरी दरापेक्षा कमी नसावेत. याप्रमाणे सदरील अधिकार मजूर सहकारी संस्थेला राहतील. |
| | ३. सभासद ओळखपत्रावर संस्थेचे चेअरमन व सहकारी संघ यांची स्वाक्षरी आवश्यक असणे. | या मागणीच्या अनुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म.रा, पुणे यांच्याकडील परिपत्रक दिनांक ०६/१२/२००८ मध्ये बदल करण्याची कार्यवाही करावी. |
| | ४. संस्थेचे कामकाज पाहता बिगर सभासद घेण्याची २५% ची मर्यादा रद्द करुन हंगामी मजूर किती घ्यावेत याबाबत सर्व अधिकार मजूर सहकारी संस्थेला असावेत जेणेकरुन कामाचा निपटारा मुदतीत करता येईल. | बिगर सभासद कामावर घेण्याची मर्यादा २५% वरुन ५०% पर्यंत करण्यात येत आहे. |
| ८ | मजूर सहकारी संस्थांची कामाची बिले देताना त्यामध्ये जी.एस.टी रक्कमेचा समाविष्ट करुन एक रक्कमी बिले अदा करणेबाबत जलसंपदा विभागाच्या दिनांक १३/११/२०१८ रोजीच्या शासन निर्णयामध्ये बदल करणेबाबत. | सर्व शासकीय / निमशासकीय खात्यामध्ये जी.एस.टी रक्कमेबाबत समानता असण्यासाठी कामांच्या अंदाजपत्रकामध्ये जी.एस.टी. च्या संपुर्ण रक्कमेचा समावेश असावा. याबाबत जलसंपदा विभागास आवश्यक ती कार्यवाही करण्याचा प्रस्ताव विभागाने पाठविण्यात यावा. |

| | | |
|---|---|---|
| ९ | ग्रामविकास विभागाची कामे देखील जिल्हा उपनिबंधक यांच्या अध्यक्षते खालील कामवाटप समितीमार्फत मजूर सहकारी संस्थांना वाटप करणेबाबत. | मजूर सहकारी संस्थांच्या कामवाटपामध्ये समान कामवाटप व सुसुत्रता येण्यासाठी ग्राम विकास विभागाचे कामेही इतर शासकीय विभागाप्रमाणे जिल्हा उपनिबंधक यांच्या अध्यक्षतेखालील कामवाटप समितीकडे देणेबाबतच्या मागणीचा प्रस्ताव ग्रामविकास विभागास सादर करण्यात यावा. |
| १० | मजूर सहकारी संस्थांचे वर्गीकरण करणेबाबत. | |
| | १. मजूर सहकारी संस्थांच्या वर्गिकरणाचा प्रस्ताव हा सहाय्यक / उप निबंधक यांचे कार्यालयाकडूनच संबधीत विभागाकडे पाठविण्यात यावा. | सदरचा प्रस्ताव हा नोंदणी निबंधक, सहाय्यक / उप निबंधक यांच्या शिफारशीने संबंधीत विभागाकडे पाठविण्यात यावा. |
| | २. मजूर सहकारी संस्थांचे सार्वजनिक बांधकाम विभागाकडील “अ” व “ब” वर्गीकरणाचे अधिकार कार्यकारी अभियंता यांना असावेत. | याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागास आवश्यक ती कार्यवाही करणेबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात यावा. |
| | ३. मजूर सहकारी संस्थेचे सार्वजनिक बांधकाम विभागाकडील वर्गीकरण इतर सर्व विभागाने ग्राहय धरावे. | या मागणीच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाने सर्व शासकिय/निमशासकिय खात्यांच्या कामांसंबंधात सर्व समावेशक आदेश निर्गमित करण्याबाबतचा प्रस्ताव सार्वजनिक विभागास सादर करण्यात यावा. |
| ११ | शासन निर्णय दिनांक २१/०१/२०१७ रद्द करणेबाबत. | |
| | १. प्रत्येक मजूर सहकारी संस्थेने मजूरांची नोंदवही ठेवावी. नोंदवहीमध्ये मजूरांची नावे, त्यांचे आधार कार्ड क्रमांक / मतदान ओळखपत्र क्रमांक, बॅकेचे नाव व खाते क्रमांक या माहितीचा समावेश असावा. | प्रत्येक मजूर सहकारी संस्थेने मजूरांची नोंदवही ठेवावी. नोंदवहीमध्ये मजूरांची नावे, त्यांचे आधारकार्ड क्रमांक / मतदान ओळखपत्र क्रमांक, या माहितीचा सामावेश असावा. |
| | २. मजूर सहकारी संस्थेने सभासदांची कामाबद्दलची मजूरी त्यांच्या बँक खात्यात धनादेश / Electronic (E.C) द्वारे जमा करावी. | भारत सरकार राजपत्र मोड ऑफ वेजेस सी/सी २०१९ क्र.२९/२०१९ मधील पान नं.०८ वरील मोड ऑफ पेमेंट ऑफ वेजेस, चाप्टर ३ अनुक्रमांक अ.क्र.१५ मध्ये THE GAZETTE OF |

| | | |
|---|---|---|
| | | INDIA, Ministry of law and justice, New Delhi the ८th August २०१९. CHAPTER III, Mode of payment of Wages.<br>१५. All Wages shall be paid in Current Coin or Currency notes or by Cheque or by Crediting the Wages in the Bank Account of the Electronic Mode.<br>अशी तरतुद आहे. म्हणून मजुर सहकारी संस्थांच्या सभासदांची मजूरी आयकर खात्याच्या मर्यादेस अधिन राहून सभासदांच्या मागणीनुसार रोखीने/ धनादेशाने दयावी. |
| | ३. संस्थेस सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयानुसार वर्गीकरणासाठी पात्रता प्रमाणपत्र देण्याकरीता यापुढे संस्थेच्या अध्यक्षांनी अर्ज करताना त्यांनी मागील वर्गीकरणाचे प्रमाणपत्र मिळाल्यापासून अर्ज करण्याच्या दिनांकापर्यंत केलेल्या कामांची संख्या मिळालेली मजूरीची रक्कम व प्रत्येक मजूर सभासदांच्या बँक खात्यात किती रक्कम जमा केली याबाबतचा तपशिल सादर करणे आवश्यक राहिल. तसेच सादर केलेली माहिती खरी असल्याबाबत प्रपत्र - अ नुसार स्वयंघोषणापत्र सादर करावे. या स्वंयघोषणा पत्राच्या आधारे संबंधित सहाय्यक निबंधक/उपनिबंधक यांनी पात्रता प्रमाणपत्र दयावे अशी अट आहे ती रद्द करुन पुर्वीच्या पध्दतीप्रमाणे ५ वर्षाचे वर्गीकरणासाठी शिफारस व्हावी. | सहकार विभागाच्या दिनांक २१/०१/२०१७ च्या शासन निर्णयातील सुचना ऐवजी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या पूर्वीच्याच कार्यपध्दतीनुसार वर्गीकरण करण्यात यावे. |
| १२ | मजूर संस्थांच्या कामे करण्याच्या अधिकतम मर्यादेस अधिन राहून शासनाच्या सर्व शासकीय व निमशासकीय खात्यांकडील डांबरीकरणाची कामे सहकारी संस्थांना मिळण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाकडील परिपत्रक दि.२७/०९/२०१८, दि.१७/०९/२०१९ व दि.११/११/२०२० मध्ये सुधारणा करणेबाबत. | याबाबत संबंधीत विभागास आवश्यक ती कार्यवाही करणेबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात यावा. |

उपरोक्त सुधारणां व्यतिरिक्त इतर मान्य केलेल्या शिफारसीनुसार सहकार आयुक्त व निबंधक, पुणे तसेच या मुद्यांशी संबंधीत मंत्रालयीन विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकामध्ये / आदेशांमध्ये आवश्यक ते बदल करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१६१५११५४०८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN VASANTRAO GAIKWAD

Digitally signed by NITIN VASANTRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=5892c3fd8686c1921e784a3faa9888d155b03f5591ce11b21a1b5006247f6972, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2276AC762AF372D872C2F01D5BB5086166F4A6E20A1BDF9762D556A93F5D118E, cn=NITIN VASANTRAO GAIKWAD
Date: 2023.07.17 10:39:15 +05'30'

**( नितीन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,
३. मा.अध्यक्ष/ मा.सभापती, महाराष्ट्र विधानमंडळ यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद), महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. विधीमंडळ सदस्य (सर्व),
८. मा.अ.मु.स./मा.प्रधान सचिव/मा.सचिव (सर्व विभाग), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, मंत्रालय, मुंबई
१०.संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३.संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४.महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
१५.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
१६.महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
१७.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन / लेखापरीक्षण).

२१. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,

२२. सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,

२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२४.कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मजूर सहकारी संघ मर्या., पुणे

२६. मुंबई-कोकण विभागीय मजूर सहकारी संघ मर्या..

२७. निवड नस्ती / (९-स).